Convertion in Regular Temporary Establishment:- Mohan Bhojraj Shende & Other 20 workers under & S.E. & Administrator CADA, Nagpur

अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर. यांच्या अधिपत्याखालील श्री.मोहन भोजराज शेंडे व इतर २० मजूर यांना रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्र.एसयुटी २०१०/(१९/२००५)/आ(कामगार)
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १८ एप्रिल, २०११.

**पहावे :-** अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर यांचे पत्र क्र.२९७/आस्था.१/लाविप्रा/२०११, दिनांक १५.१.२०११.

**प्रस्तावना:-**

सर्वश्री.मोहन भोजराज शेंडे व इतर २० मजूर यांना हंगामी कामगार म्हणुन सन १९८७ पासून सन २००१ पर्यंत खरीप व रब्बी हंगामात पाणी वाटपाच्या कामासाठी कामावर घेण्यात येत असे व काम संपल्यानंतर कामावरुन कमी करण्यात येत असे. कामावरुन कमी केल्यामुळे सन २००३ मध्ये मा.औद्योगिक न्यायालय, भंडारा येथे क्र. ३९,४१, ४३,४६, ४७,४८, ५०,५६, ५८,५९, ६०, ६१, ६२, ६३, ६७, ६८, ७२, ७४, ७६, ८० व ८३/२००३ असे एकुण २१ दावे दाखल केले. मा. औद्योगिक न्यायालयाने दि.१९.१०.२००४ रोजी सदर दावे निकाली काढून या कामगारांना न्यायनिर्णयातील परिच्छेद-८ मध्ये नमूद केलेल्या दिनांकापासून रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावे, दि.१.१२.२००३ पासून सेवेत होते त्या कालावधी पर्यत वेतनातील फरक दयावा व यानुसार कार्यवाही सहा महिन्याच्या आत करावी, असा एकत्रित निर्णय दिला.

मा.औद्योगिक न्यायालय, भंडारा यांच्या उपरोक्त दि.१९.१०.२००४ च्या निर्णयाविरुध्द, विधी व न्याय विभाग, नागपूर यांच्या सल्ल्याने, शासनाच्यावतीने मा.उच्च न्यायालय, नागपूर येथे क्र.४६४६,४६४७,४६५२ ते ४६६७,४६८१ ते ४६८३/२००५ अशा २१ याचिका दाखल करण्यात आल्या. उच्च न्यायालयाने त्या दि.१२.२.२००७ रोजी खारिज केल्या व संबंधित कामगारांनी सतत ५ वर्षे सातत्याने काम केले असल्यामुळे मा.औद्योगिक न्यायालय, भंडारा यांनी दि.१९.१०.२००४ रोजी दिलेला निकाल योग्य असल्याचा निर्णय दिला.

मा.उच्च न्यायालय, नागपूर यांच्या उपरोक्त दि.१२.२.२००७ च्या निर्णयाविरुध्द विधी व न्याय विभागाच्या

सहमतीने शासनातर्फे मा.उच्च न्यायालय,खंडपीठ नागपूर येथे एकूण २१ एलपीए दाखल करण्यात आल्या होत्या सदर २१ एलपीए पैकी १९ एल.पी.ए.मध्ये (सर्वश्री.मोहन भोजराज शेंडे व इतर १८) दि.१५.०९.२००९ रोजी न्यायनिर्णय होऊन सदर १९ एल.पी.ए. मा. उच्च न्यायालयाने फेटाळल्या. उर्वरित २ एल.पी.ए.पैकी श्री इंदल लेदे यांच्याबाबतची एल.पी.ए. दिनांक १६.१२.२००८ रोजी व श्री. ठवकर यांच्याबाबतची एल.पी.ए. दिनांक ०२.०८.२०१० रोजी फेटाळली.

मा.उच्च न्यायालयाने सदर २० प्रकरणी दिलेल्या न्याय निर्णयाविरुध्द शासन मान्यतेने मा.सर्वोच्च न्यायालयात २० एस.एल.पी. दाखल करण्यात आल्या होत्या. त्यापैकी १९ प्रकरणी मा. सर्वोच्च न्यायालयाने दि.१२.७.२०१० रोजी निकाल देऊन खालच्या कोर्टाच्या निर्णयात हस्तक्षेप करण्यास नकार दिला व प्रकरणे खारीज केली. सदर प्रकरणी सर्वोच्च न्यायालयाच्या सरकारी वकीलांनी Review petition दाखल करणे योग्य होणार नसल्याचे अभिप्राय दिले आहेत. तसेच Review Petition करण्यास वाव नसल्याचे अभिप्राय सह सचिव, विधी व याय विभाग,नागपूर यांनी दिले आहेत. त्याचप्रमाणे श्री.लेदे यांच्या प्रकरणी मा.सर्वोच्च न्यायालय,दिल्ली येथे शासन मान्यतेने दाखल केलेली एस.एल.पी. प्रलंबित आहे. श्री.तानाजी संपत ठवकर(मयत), यांच्या एल.पी.ए.प्रकरणी मा.उच्च न्यायालयाने दि.२.८.२०१० रोजी शासन विरोधात दिलेल्या निकालाबाबत महामंडळाचे वकील श्री.ए.आर.पाटील, ए पॅनेल यांनी दिनांक १५.११.२०१० रोजी वरीलप्रमाणे १९ एल.पी.ए.खारीज झाल्या असल्याने व त्याविरुध्द दाखल केलेल्या एस.एल.पी. सुध्दा मा.सर्वोच्च न्यायालयाने खारीज केलेल्या असल्याने सदर प्रकरणी मा.सर्वोच्च न्यायालयात अपील करण्यासाठी वाव नाही असे अभिमत दिलेले आहे. तसेच सदर प्रकरणी एस.एल.पी.दाखल करण्यास वाव नसल्याचे अभिप्राय सह सचिव, विधी व न्याय विभाग, नागपूर यांनी दिले आहेत. उपरोक्त सर्व कर्मचारी हे अद्यापही सेवेत नाहीत.

उपरोक्त अर्जदारापैकी सर्वश्री.मोहन भोजराज शेंडे व इतर १८ कामगारांनी न्यायनिर्णयाच्या अंमलबजावणीसाठी मा.कामगार न्यायालय,भंडारा येथे वेगवेगळया अवमान याचिका दाखल केल्या आहेत.

सदर सर्व वस्तुस्थिती विचारात घेवून,श्री.मोहन शेंडे व इतर २० कामगार यांचे प्रकरणी संबंधित कामगारांना औद्योगिक न्यायालयच्या दिनांक १९ ऑक्टोबर २००४ च्या निर्णयातील परि.८ मध्ये नमूद केलेल्या दिनांकापासून रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्ताव सचिव समितीसमोर दि.२५.३.२०११ च्या बैठकीत सादर करण्यात आला. त्यास सचिव समितीने मान्यता दिली. सचिव समितीने दिलेल्या मान्यतेनुसार सदर २१ मजूरांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

**शासन निर्णय :-**

अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर यांच्या नियंत्रणाखालील कार्यालयांतर्गत सद्य:स्थितीत कार्यरत नसलेल्या २१ मजूरांना मा. औद्योगिक न्यायालय,भंडारा यांच्या दिनांक १९.१०.२००४ च्या निर्णयानुसार व त्यामधील परि.८ मध्ये नमूद केलेल्या दिनांकाच्या अनुषंगाने त्यांनी धारण केलेले तत्सम पद अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यास खालीलप्रमाणे शासन मंजूरी देत आहे.

| अ.क्र. | कर्मचा-यांचे नांव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | रु.अ.आ.वर घ्यावयाचे पद व दिनांक | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **६** | **७** |
| १ | श्री. मोहन भोजराज शेंडे | रोजंदारी | मजूर सन १९८९ | मजूर दि.१.१.९६ | रु.७५०-९४०(जुनी) २५५०-३२००(५ वा वेतन आयोग) |
| २ | श्री.शालीकराम जागोजी बांते | रोजंदारी | मजूर सन १९८८ | मजूर दि.१.१.९३ | ----------"------- |
| ३ | श्री.शालीकराम जागोजी तांदुळकर | रोजंदारी | मजूर सन १९८८ | मजूर दि.१.१.९३ | ---------"-------- |
| ४ | श्री.संतोष डोमा रणदिवे | रोजंदारी | मजूर सन १९८८ | मजूर दि.१.१.९५ | ---------"-------- |
| ५ | श्री.विठ्ठल मारोती लिल्लारे | रोजंदारी | मजूर सन १९९१ | मजूर दि.१.१.९६ | ---------"-------- |
| ६ | श्री.गोरेलाल शंकर नागपूरे | रोजंदारी | मजूर सन १९८९ | मजूर दि.१.१.९६ | ---------"-------- |
| ७ | श्री.ईश्वर तुळशीराम देशमुख | रोजंदारी | मजूर सन १९८७ | मजूर दि.१.१.९३ | ---------"-------- |
| ८ | श्री. जयदेव गोदरु वैद्य | रोजंदारी | मजूर सन १९८९ | मजूर दि.१.१.९७ | ---------"-------- |
| ९ | श्री.जिवन मुकल कासकरे | रोजंदारी | मजूर सन १९८० | मजूर दि.१.१.९८ | ---------"-------- |
| १० | श्री.श्रीराम संपत ठवकर | रोजंदारी | मजूर सन १९८८ | मजूर दि.१.१.९४ | ---------"-------- |
| ११ | श्री.नारायण चैत्रु माटे | रोजंदारी | मजूर सन १९९१ | मजूर दि.१.१.९६ | ---------"-------- |
| १२ | श्री.जसवंत बुधा सार्वे | रोजंदारी | मजूर सन १९८८ | मजूर दि.१.१.९४ | ---------"-------- |

| अ.क्र. | कर्मचा-यांचे नांव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | रु.अ.आ.वर घ्यावयाचे पद व दिनांक | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|
| १३ | श्री.हरलाल बलराम वैद्य | रोजंदारी | मजूर सन १९८८ | मजूर दि.१.१.९४ | रु.७५०-९४०(जुनी) २५५०-३२००(५ वा वेतन आयोग) |
| १४ | श्री.गणेश नामदेव गजभिये | रोजंदारी | मजूर सन १९८७ | मजूर दि.१.१.९१ | ---------"-------- |
| १५ | श्री.प्रल्लाद संपत कोहपरे | रोजंदारी | मजूर सन १९८७ | मजूर दि.१.१.९६ | ---------"-------- |
| १६ | श्री.गजानन काबल बांते | रोजंदारी | मजूर सन १९८८ | मजूर दि.१.१.९४ | ---------"-------- |
| १७ | श्री.राष्ट्रपाल पांडुरंग बोरकर | रोजंदारी | मजूर सन १९८८ | मजूर दि.१.१.९३ | ---------"-------- |
| १८ | श्री.बाबुलाल वांशु वासनिक | रोजंदारी | मजूर सन १९८७ | मजूर दि.१.१.९३ | ---------"-------- |
| १९ | श्री.अमृत तेजराम सार्वे(मयत) | रोजंदारी | मजूर सन १९८८ | मजूर दि.१.१.९३ | ---------"-------- |
| २० | श्री.तानाजी संपत ठवकर (मयत) | रोजंदारी | मजूर सन १९८८ | मजूर दि.१.१.९५ | ---------"-------- |
| २१ | श्री इंदल बाजीराव लेदे | रोजंदारी | मजूर सन १९८७ | मजूर दि.१.१.९२ | ---------"-------- |

२. सदर २१ मजूरांना त्यांनी धारण केलेल्या पदांवर रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत केलेल्या पदांकरिता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान/कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचा-यांचे बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यात येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशी व्यतीरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट देखिल शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यांत येत आहे.

३. अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर यांनी या आदेशातील सर्व बाबी विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत,याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासननिर्णयाच्या

दिनांकापासून एक महिन्याचे आत निर्गमित करुन ते संबंधित कर्मचा-यांच्या/ त्यांच्या वारसदारांच्या निदर्शनास आणावेत. तपशिलामध्ये संबंधित कर्मचा-यांचे नांव,पदनाम ,त्यांचा प्रथम नियुक्तीचा दिनांक व त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे तो दिनांक यामध्ये कोणतीही चूक वा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिका-यांनी अशी बाब शासनाच्या निदर्शनास तात्काळ आणावी. क्षेत्रिय अधिका-यांनी सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करु नयेत. तसेच हे आदेश संबंधित कर्मचा-याच्या/ त्यांच्या वारसदारांच्या व्यक्तीशः निदर्शनास आणून शासनाने निर्गमित केलेल्या आदेशांच्या बाबतीत संबंधित कर्मचा-यांची (नाव,पदनाम,त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक तसेच रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याच्या दिनांकात दुरुस्ती इ. बाबतीत) कोणतीही तक्रार नसल्यास त्यांच्याकडून/ त्यांच्या वारसदारांकडून तशा आशयाचे प्रपत्र "ब" मधील दिलेल्या नमुन्यात हमीपत्र(Undertaking) घेवून ते त्या कर्मचा-यांच्या सेवापटात/सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनानकडे पाठविला जाईल,याबाबत संबंधीत अधीक्षक अभियंत्यांनी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत/त्रुटी असल्याची संबंधित कर्मचा-यांची/वारसदारांची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरुपात घ्यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरुस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरुस्ती प्रस्ताव पाठवितांना संबंधित कर्मचा-यांच्या नेमणुकांच्या आदेशांच्या प्रती,नाममात्र हजेरी पटाच्या प्रती,आणि सेवापट पाठविण्याची खबरदारी घ्यावी.

४. न्यायनिर्णयानुसार सदर २१ मजूरांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेवून दि.०१.१२.२००३ पासून सेवेत असेपर्यतचे आथिक लाभ देण्याबाबतचे न्यायालयाचे निदेश आहेत. परंतु सदर कामगार हे सन २००१ पूवीपासून कामावर नसल्यामुळे त्यांना कोणतीही थकबाकी देय असणार नाही. तसेच, त्यांच्या वेतनाची परिगणना त्यांना रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी.

५. सदर प्रस्तावातील वेतनापोटी होणारा खर्च सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षात संबंधित लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे आदेश,शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग,क्र.एसआरव्ही-१०९७/प्र.क्र.२२/९७/१२, दि.१८.११.१९९७ न्यायालयीन निर्णयासंदर्भात करावयाच्या कार्यवाहीबाबत निर्णय घेण्यासाठी गठीत केलेल्या सचिव समितीने दि.२५.०३.२०११ रोजी दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

७. हा शासन निर्णय www.maharashtra.gov.in हया संकेत स्थळावर २०११०४१८२३०५५०००१ हया संकेत क्रमांकावर प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( अ.अ.कोदे)
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत :-

महालेखापाल,लेखा व अनुज्ञेयता,महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२,नागपूर
महालेखापाल,लेखा परिक्षा ,महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२,नागपूर
वित्त विभाग(व्यय १२), मंत्रालय,मुंबई
अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर.
प्रकल्प अधिकारी, भु व जल व्यवस्थापन पथदशी प्रकल्प,नागपूर
आस्थापना(कामगार)संग्रहार्थ.